५५

**प्रशासकीय मान्यता-**
चांदवड जिल्हा-नाशिक येथील न्यायाधीशांकरिता
निवासस्थान बांधण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीआरक्यू-२५०९/८२८/प्र.क्र.१६९/का.१३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि:- ४ ऑक्टोबर,२०१०

पहा :- -१) प्रबंधक(निरीक्षण-२) उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यु)६०६०/१९६८, दि.९.१०.२००९.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नाशिक यांचे पत्र क्र.बिल्डिंग-/७५३६/२००९, दि.१५.९.२००९.

शासन निर्णय :- चांदवड जिल्हा नाशिक येथील न्यायाधीशांकरिता निवासस्थान बांधण्यासाठी येणाऱ्या रु. १८,७०,९४०( रु.अठरा लक्ष, सत्तर हजार, नऊशे चाळीस फक्त) इतक्या अंदाजित खर्चास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

( रुपये )

| अ.क्र | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | बांधकामाची किंमत | १०,७८,००० |
| २ | ४% आकस्मिकता खर्च | ४३,१२० |
| ३ | ८% बाहय पाणीपुरवठा आणि मलनिस्सारण | ८६,२४० |
| ४ | ११% विद्युत जोडणी | १,१८,५८० |
| ५ | अंतर्गत रस्ते | २,००,००० |
| ६ | स्ट्रीट लाईट | ५०,००० |
| ७ | सौर उर्जेवरील वॉटर हीटर | २५,००० |
| ८ | कंपाऊड वॉल | २,००,००० |
| ९ | रॅम्प | १०,००० |
| १० | फायर फायटींग | १०,००० |
| ११ | रेन वॉटर हार्वेस्टींग | ५०,००० |
| | एकूण - | १८,७०,९४० |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) " काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबत खातरजमा करण्यात यावी."

(ब) " प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मांडणी नकाशा तयार करुन घेतल्यावरच सुरु करावे."

(क) " विस्तृत अंदाजपत्रक करतेवेळी अंतर्गत रस्ते, संरक्षण भिंत इ.बाबतची मापे छेद नकाशासह अंदाजपत्रकात अंतर्भूत करावीत."

३.  या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६ गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७०० इतर गृहनिर्माण (एक) न्यायदान,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४.  हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-३७३/इमा-२, दि.२९.१२.२००९ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र.:-विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी.

**प्रति,**

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,नाशिक,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,नाशिक,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व)विभाग,नाशिक,
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग,चांदवड ,
जिल्हा कोषागार अधिकारी,नाशिक,
उप कोषागार अधिकारी,चांदवड, जि.नाशिक,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
कार्यासन अधिकारी,(का.११ व १२),विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव,उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई- ४०० ०३२,
महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२,
निवड नस्ती.